**नगर रचना आणि मुल्यनिर्धारण संचालनालयाचे विधी विषयक कामकाज हाताळण्यासाठी संचालनालयाच्या आस्थापनेवर विधी अधिकाऱ्यांची पदे निर्माण करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक -टिपीव्ही-१६/१०/७१८/प्र.क्र. १९४/१०/नवि-२७**
मादाम काम रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक: २९ जून, २०१५.

**संदर्भ:** १) संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. आस्था/विधी अधि/ प्रशा-१/४५३३, दि.२२.०७.२०१०
२) उच्चस्तर सचिव समितीच्या दि.२१.०१.२०११ रोजीच्या बैठकीचे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे क्र.पदनि-२०११/प्र.क्र.०५/११/वित्तीय सुधारणा-१, दि.२९.०१.२०११ रोजी निर्गत केलेले कार्यवृत्त.

**प्रस्तावना :**

नगर रचना व मुल्यनिर्धारण संचालनालयाच्या नियंत्रणाखाली, ६ प्रादेशिक विभागीय कार्यालये कार्यरत आहेत. सदर कार्यालयांकडून महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम,१९६६ मधील तरतूदींच्या अनुषंगाने कार्यवाही केली जाते. तथापि अशा कार्यवाहीस विविध स्तरांवर मा. न्यायालयांमध्ये आव्हान दिले जाते. सद्यस्थितीत अशा न्यायालयीन प्रकरणांची संख्या मोठया प्रमाणावर वाढत असून, अशी न्यायालयीन प्रकरणे हाताळतांना संचालनालयातील कर्मचाऱ्यांना विधी विषयक पुरेसे ज्ञान नसल्याने न्यायीक प्रकरणांबाबत कार्यवाही करताना अडचणी उदभवत आहेत. याशिवाय संचालनालयाशी निगडीत प्रशासकीय स्वरुपाच्या न्यायालयीन प्रकरणीदेखील अडचणी येत असतात. यास्तव "विधी अधिकारी" अशी पदे नगर रचना संचालनालयाच्या आस्थापनेवर निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर प्रस्तावावर आता शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

नगर विकास विभागाच्या अधिपत्याखालील नगर रचना व मुल्यानिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवर "विधी अधिकारी" यांची ४(चार) पदे निर्माण करण्यात येत आहेत.

| पदनाम | वेतनश्रेणी |
|---|---|
| विधी अधिकारी | वेतन बँड १५६००-३९१०० ग्रेड पे ५४०० |

२. सदर पदावरील अधिकाऱ्यांकडील कामकाजाचे वाटप पुढीलप्रमाणे राहील:-

| अ.क्र. | पद | कार्यक्षेत्र |
|---|---|---|
| १ | विधी अधिकारी, कोकण विभाग | कोकण विभाग,नाशिक विभाग, नगर विकास विभागातील, नगर रचना कक्ष. |
| २ | विधी अधिकारी, औरंगाबाद विभाग | औरंगाबाद विभाग व नाशिक विभागातील मा.उच्च न्यायालय औरंगाबाद खंडपीठास जोडलेला भाग. |
| ३ | विधी अधिकारी, नागपूर विभाग | नागपूर व अमरावती विभाग. |
| ४ | विधी अधिकारी, पुणे विभाग | पुणे मुख्य कार्यालय व पुणे विभाग. |

३. उपरोक्तप्रमाणे विधी अधिकाऱ्यांचे प्रादेशिक विभागनिहाय कार्यक्षेत्र असले तरी संचालक, नगर रचना, पुणे यांना, कामकाजाची तातडी तसेच विधी अधिकाऱ्यांची उपलब्धता लक्षात घेवून कोणत्याही विभागातील कामकाज अन्य विभागातील अधिकाऱ्यास सोपविता येईल.

४. संचालनालयाच्या अधिपत्याखालील विधी अधिकाऱ्यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या पुढीलप्रमाणे राहतील:-

१) संबंधित प्रादेशिक विभागीय कार्यक्षेत्रात प्राप्त होणाऱ्या महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम,१९६६ खालील प्रकरणी आवश्यकतेनुसार सर्व प्रकारच्या कायदेविषयक बाबींबाबत / न्यायालयीन प्रकरणी सल्ला देणे.

२) नगर रचना संचालनालयाशी निगडीत/ सेवाविषयक / प्रशासकीय बाबींसंदर्भातील सर्व न्यायालयील प्रकरणी सल्ला देणे.

३) उपरोक्त ४(१) व ४(२) प्रलंबित न्यायालयीन प्रकरणे तत्परतेने निकाली काढण्यासाठी संबंधीत सरकारी वकीलांकडे पाठपुरावा करणे.

४) ज्या न्यायालयील प्रकरणी शासन किंवा संचालनालय प्रतिवादी आहे अशा प्रकरणी संबंधीत अधिकाऱ्यांच्या मदतीने परिच्छेदनिहाय अभिप्राय/शपथपत्राचा मसुदा तयार करणे व त्यास सक्षम प्राधिकाऱ्यांची मान्यता घेऊन ते न्यायालयात विहित मुदतीत सादर करणे.

५) ज्या न्यायालयीन प्रकरणी न्यायालयाने शासनाच्या विरुद्ध निर्णय दिलेला असेल अशा प्रकरणांमध्ये न्यायालयाच्या निर्णयाविरुद्ध सक्षम न्यायाधिकरणात अपिल दाखल करण्याची आवश्यकता याबाबत सरकारी वकिलांशी समन्वय साधून उचित कार्यवाही करणे.

६) अपिलाबाबत निर्णय झाल्यास अपिलाचा मसुदा तयार करुन सबंधीत सरकारी वकीलांमार्फत अपिल दाखल करुन अपीलाचा निर्णय होईपर्यंत त्याबाबत पाठपुरावा करणे.

७) महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ व महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ च्या प्रकरणांमध्ये शासनास / संचालनालयास सल्ला देणे.

८) विधी विषयक कामकाजाबाबत शासन/संचालक नगर रचना, पुणे वेळोवेळी नमुद करतील अशी कार्ये विहित मुदतीत पार पाडणे.

५. सदर -विधी अधिकारी॰ या पदावरील अधिकाऱ्यांच्या वेतन व भत्यावरील खर्च

| | |
|---|---|
| २२१७ | नगर विकास |
| ८० | सर्वसाधारण |
| ००१ | संचालन व प्रशासन |
| (००)(०८) | नगर रचना विभागातील कर्मचारी वर्गात वाढ करणे-दत्तमत(२२१७०२१६) या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. |

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५७१/व्यय-३, दि.२४.१२.२०१० अनुसार उच्चस्तरीय सचिव समितीने दि.२१.१.२०११ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१५०६२९१७०३५८१५२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Siddharam K Salimath

Digitally signed by Siddharam K Salimath
DN: CN = Siddharam K Salimath, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.29 17:06:28 +05'30'

(एस. के. सालीमठ)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.

४. प्रधान सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (विधी व न्याय विभाग) मंत्रालय, मुंबई.
६. संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. संचालक, नगर रचना,तथा सह सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
८. सह संचालक, नगर रचना, पुणे/कोकण/नाशिक/अमरावती/औरंगाबाद/नागपूर विभाग.
९. उप संचालक, नगर रचना, अमरावती/औरंगाबाद विभाग.
१०.महालेखापाल, लेखापरिक्षा व लेखाअनुज्ञेयता, महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर.
११.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ औरंगाबाद/नाशिक/ठाणे/अमरावती/नागपूर.
१३.अवर सचिव, (नवि-११/नवि-१३/नवि-३०),मंत्रालय, मुंबई.
१४.कक्ष अधिकारी, (नवि-४/नवि-९/ नवि-१०/ नवि-१२) नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
१५.निवड नस्ती (नवि-२७).